**इंदापूर नगरपरिषद हद्दीतील रस्ता अवर्गीकृत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- रवियो-२०१७/प्र.क्र.४४/नियोजन-२**
**मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.**
**दिनांक :- ३० मे,२०१७.**

**पहावे :-** १) शासन निर्णय क्रमांक-आरबीडी-१०८१/ ८७१/रस्ते-७, दि.०९/०३/२००१.

२) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे यांचे पत्र क्र.- जा.क्र.मुअ(पुणे)/का-२/रेशा/५६/१७४४/२०१७, दिनांक ११/०४/२०१७.

**प्रस्तावना :-**

पुणे-सोलापूर-हैदराबाद राष्ट्रीय महामार्ग क्र.९ (जुना) नवीन ६५ या रस्त्याची इंदापूर शहरातून जाणारी लांबी कि.मी. १३२/२०० ते १३७/२०० अशी होती. इंदापूर शहराच्या पश्चिम बाजूकडून NHAI कडून ८ कि.मी. लांबीचा बाह्यवळण मार्ग अस्तित्वात आल्याने व त्यावरून अखंडीत वाहतूक सुरू झाल्याने शासन निर्णय क्रमांक रवियो-२०१३/प्र.क्र.५/नियोजन-२ दि. ०६/०५/२०१४ नुसार पुणे जिल्ह्यातील नगरपरिषद हद्दीतील राष्ट्रीय महामार्ग क्र.९ ची इंदापूर शहरातून जाणारी लांबी दर्जावनत करून राज्यमार्ग क्र. १२५ अ अशी करण्यात आलेली आहे. सदरचा राज्यमार्ग क्र. १२५ अ हा रस्ता अवर्गीकृत करण्याचा प्रस्ताव संदर्भ क्र. २ अन्वये शासनास प्राप्त झालेला आहे. त्यानुषंगाने राज्यमार्ग क्र. १२५ अ हा रस्ता अवर्गीकृत करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय :-**

मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.विभाग,पुणे यांचा प्रस्ताव तसेच संदर्भाधीन शासन निर्णय क्रमांक-आरबीडी-१०८१/ ८७१/ रस्ते-७, दि.०९/०३/२००१ मधील टिप ५ मधील तरतूद विचारात घेऊन, पुणे जिल्ह्यातील इंदापूर नगरपरिषद हद्दीतील राज्यमार्ग क्र. १२५ अ हा ५.०० कि.मी. (साखळी क्र. १३२/२०० ते १३७/२००) लांबीचा रस्ता अवर्गीकृत करण्यात येत आहेत.

राज्यमार्ग क्र. १२५ अ ची **५.०० कि.मी.** लांबी (साखळी क्र. १३२/२०० ते १३७/२००) अवर्गीकृत करण्यात येत आहे. सदर रस्त्याच्या देखभाल-दुरूस्तीचा खर्च नगरपरिषदेकडून करण्यात येईल व अवर्गीकृत केलेल्या रस्त्यावर होणाऱ्या देखभाल-दुरूस्ती करिता शासनामार्फत कोमतेही अतिरिक्त अनुदान देण्यात येणार नाही. या अटींच्या अधीन राहून सदर इंदापूर नगरपरिषद हद्दीतून जाणाऱ्या राज्यमार्ग क्र.१२५ अ ची ५.०० कि.मी. लांबी (साखळी क्र. १३२/२०० ते १३७/२००) ही अवर्गीकृत करण्यास शासन याद्वारे मान्यता देत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०५३०१५५२०५५७१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Prashant Vinayakrao Patil

Digitally signed by Prashant Vinayakrao Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2b1bad66664b1e11e3bf66db1d526143e814db5f8c505422af66a5628314537e, cn=Prashant Vinayakrao Patil
Date: 2017.05.30 15:54:00 +05'30'

**(प्रशांत पाटील)**
अवर सचिव (नियोजन), महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग,पुणे (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा)
२) विभागीय आयुक्त, पुणे.
३) अधिक्षक अभियंता, सा.बां.मंडळ, पुणे (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करण्यात यावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा)
४) जिल्हाधिकारी, पुणे.
५) मुख्याधिकारी, नगरपरिषद इंदापूर.
६) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम पूर्व विभाग, पुणे १.
७) कार्यकारी अभियंता, (सा.बां.) जिल्हा परिषद,पुणे .
८) संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई
९) रस्ते विकास योजना २००१-२०२१ ची नस्ती.
१०) निवडनस्ती.